विधीमंडळाच्या नागपूर अधिवेशन कालावधीत पदाधिकारी /अधिकारी/कर्मचारी यांनी शासकीय वाहनांचा वापर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक- विमंअ ३२२०/प्र.क्र. ७८/कार्यासन-७**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक:- २७ ऑक्टोबर, २०२०

__संदर्भ-__ १) शासन परिपत्रक ,सा.प्र. विभाग क्र. एनएएस-२००४/प्र.क्र.१३५/०४/सात, दिनांक ०१ डिसेंबर,२००४

२) शासन निर्णय वित्त विभाग, क्र. वाहन-२०१४/प्र.क्र.२३/१४/विनियम, दिनांक ३० मे, २०१४.

३) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग नाहिअ ३०१५/प्र.क्र.१५५/ सात, दिनांक १० नोव्हेंबर, २०१५.

__प्रस्तावना-__

नागपूर हिवाळी अधिवेशन कालावधीत पदाधिकारी /अधिकारी/कर्मचारी यांनी शासकीय वाहनाचा वापर करण्याबाबत संदर्भाधिन अनुक्रमांक १ च्या परिपत्रान्वये सूचना देण्यात आल्या आहेत. संदर्भाधिन अनुक्रमांक २ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे शासकीय वाहनांच्या खाजगी कामासाठी केलेल्या वापराचे दर नमूद करण्यात आले आहेत. त्यानुसार या विभागाने संदर्भाधीन अनुक्रमांक ३ च्या दिनांक १० नोव्हेंबर, २०१५ च्या शासन परिपत्रकान्वये निदेश दिले आहेत.

**परिपत्रक -**

नागपूर येथील विधानमंडळाच्या हिवाळी अधिवेशन कालावधीत मंत्री, राज्यमंत्री तसेच शासनाचे व महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाचे अधिकारी व मंत्रालयीन शिबीर कार्यालय इत्यादींसाठी आवश्यक असलेली वाहने (मोटार व जीप्स) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग यांच्याकडून अधिवेशनाचे कामकाज पार पाडण्यासाठी अधिग्रहीत केली जातात. सदर शासकीय वाहनांच्या इंधनावरील खर्चात काटकसर करण्याच्या दृष्टीने नेमका कसा वापर करण्यात यावा याबाबतीत खालीलप्रमाणे निदेश देण्यात येत आहेत.

१) शासकीय वाहने फक्त शासकीय कामासाठीच वापरावीत.

२) शासकीय वाहने शासकीय कामकाजासाठी सुध्दा शक्यतो नागपूर शहराच्या हद्दीबाहेर नेण्यात येऊ नयेत.

ब ) तथापि तरीही काही अपरिहार्य कारणास्तव शासकीय वाहनांचा नागपूर शहरांच्या हद्दीबाहेर वापर करावयाचा झाल्यास ही वाहने नागपूर शहराच्या हद्दीबाहेर नेण्यासाठी योग्य ती समर्थनीय कारणे विभागीय आयुक्त, नागपूर यांना सादर करुन या वाहनांचा वापर करण्यासाठी रीतसर त्यांची परवानगी घेण्यात यावी.

क) सदरील शासकीय वाहनांचा वापर हा दरदिवशी ८० कि.मी. च्या वर जाणार नाही

याद्दष्टीने संबधितांनी खबरदारी घ्यावी.

३. शासकीय वाहनांचा वापर शासकीय कामकाजासाठी करण्याबाबत वरीलप्रमाणे शासनाचे स्थायी स्वरुपाचे निदेश असले तरीही काही पदाधिकारी, अधिकारी / कर्मचारी यांच्याकडून नागपूर येथील विधीमंडळाच्या अधिवेशन कालावधीत खाजगी कामासाठी गैरवापर केला जातो, असे आरोप वर्तमानपत्रांतून केले जातात. तसेच विविध सामाजिक संस्थांकडून अशा आशयाच्या तक्रारी शासनाकडे प्राप्त होतात. त्यामुळे

अशा तक्रारींची दखल शासनाला घेणे क्रमप्राप्त होते. तेव्हा शासकीय वाहनाच्या खाजगी वापरावर प्रतिबंध आणण्याच्या दृष्टीने काय उपाययोजना करता येतील याबाबत शासनस्तरावर सखोल विचार केल्यानंतर शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत.

**अ)** या शासन परिपत्रकातील उपरोक्त परिच्छेदातील निदेश लक्षात घेता शासकीय वाहनांचा खाजगी वापर अपेक्षित नाही हे स्पष्ट आहे. तथापि नागपूर अधिवेशन कालावधीत काही अपरिहार्य कारणास्तव शासकीय वाहनांचा खाजगी वापर अनिवार्य झाला असेल तर, अशा परिस्थितीत वित्त विभाग शासन निर्णय क्र.वाहन-२०१४/प्र.क्र.२३/विनियम, दि. ३० मे, २०१४ मधील तरतुदीनुसार प्रत्येक शासकीय वाहनाच्या खाजगी वापरासाठी पेट्रोल, डिझेल व सीएनजी वर चालणा-या सर्व वाहनांसाठी सरसकटपणे रु. १२ /- (रुपये बारा फक्त) प्रति किलोमीटर या दराने वसूली करण्यात यावी, तसेच त्याची कमाल मर्यादा प्रतिमाह ७०० कि.मी असेल. तथापि अपवादात्मक बाबतीत सदर ७०० कि.मी .मर्यादा ओलांडल्यास त्यापुढील अंतरासाठी रु. १८/- (रुपये अठरा फक्त) प्रति कि.मी. या दराने संबंधितांकडून वसुली करण्यात यावी.

**ब)** शासकीय वाहन खाजगी वापरात असताना त्यासाठी असलेला खोळंब्याचा (Detention) दर प्रति तास रु ८/- व कमाल रु ८०/- प्रतिदिवशी इतका असेल. खोळंब्याचा काळ मोजताना पहिल्या तीन तासांचा वापर सोडण्यात यावा.

**क)** शासकीय वाहनाचा वरील कार्यपध्दतीनुसार खाजगी वापर करण्यापूर्वी संबंधित पदाधिकारी/अधिकारी/कर्मचारी यांनी सदरहू वापराबाबतची सर्व तपशिलवार माहिती विभागीय आयुक्त, नागपूर यांना उपलब्ध करुन द्यावी.

**ड)** वरील निदेश /सूचना अधिग्रहित करण्या येणा-या वाहनांच्या सर्व वाहनचालकांच्या निदर्शनास आणाव्यात.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२०१०२९१३५०३७१३०७ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT M DESHPANDE

Digitally signed by SHRIKANT M DESHPANDE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=ALL INDIA SERVICES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fbe6817f24737bd4bc10f54ce9890a85094b471dfa59ad241b9368f0fa7bc5ee, serialNumber=2f6f50e472d07b6d0a7dafbb9041ea434ee8354747392652dc252e4ec6b05ad1, cn=SHRIKANT M DESHPANDE
Date: 2020.10.29 13:53:39 +05'30'

**( श्रीकांत देशपांडे )**

**प्रधान सचिव, (प्र.सु.व र.व.का )**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव (५ प्रती)

२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद /विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

५) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

६) मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

७) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

८) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
९) सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१०) मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११) विभागीय आयुक्त, नागपूर /अमरावती /औरंगाबाद/नाशिक,
१२) जिल्हाधिकारी, नागपूर
१३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ नागपूर,
१४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक १, नागपूर
१५) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१६) निवडनस्ती, कार्यासन-७.

**********